अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२०-२१
" २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१) " मागणी क्रमांक वाय-२

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९०/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ८ सप्टेंबर, २०२०

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि.१ एप्रिल २०२०
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२०-२१ करिता ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये १०.१३०५ कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्याच्या दृष्टीने राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये इतर उद्दीष्टांतर्गत म्हणजेच ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखालील खर्च विभागांनी वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय करु नये असे सदर परिपत्रकात नमूद केले आहे. त्यानुषंगाने नस्ती वित्त विभागास सादर केली असता वित्त विभागाने माहे एप्रिल-जून तसेच माहे जुलै ते सप्टेंबर करिता एकूण

तरतूदीच्या केवळ २०% निधी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुषंगाने वेतनेतर अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)” या लेखाशिर्षाखाली ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये २,०२,६१,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी दोन लाख एकसष्ठ हजार फक्त ) इतके अनुदान संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. उपरोक्त लेखाशीर्षातर्गत सन २०१९-२० चा अखर्चित निधी शासनास जमा करण्याच्या अधीन सदर निधी वितरीत करण्यात येत असून, अखर्चित निधी शासनास जमा केल्याशिवाय निधी कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. सदर वेतनेतर निधी संबंधित जिल्हा परिषदांनी प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, भाडेपट्टी, मोटरवाहन, पेट्रोल/तेल/वंगण इत्यादी बाबींसाठी आवश्यकतेनुसार वापरावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्याच्या दृष्टीने राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे.

४. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

५. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

६.	या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६०/व्यय-३, दिनांक १९ ऑगस्ट, २०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत. वित्त विभागाच्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०८१४१३८४५०९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.09.08 14:21:39 +05'30'

**( चेतन निकम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

११.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१३.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४.ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१५.निवड नस्ती कार्यासन पापु-२३

विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४२०/प्र.क्र.९०/पापु-२३, दिनांक ८ सप्टेंबर, २०२० सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (स्थानिक क्षेत्र) (०१) (०५) नियमित आस्थापना (२२१५१८८१)" | | | |
|---|---|---|---|
| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०२०-२१ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत अनुदान | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २ | पालघर | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| ३ | रायगड | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| ६ | नाशिक | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ७ | धुळे | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ९ | जळगांव | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १० | अहमदनगर | ११५००० | रूपये एक लाख पंधरा हजार फक्त |
| ११ | पुणे | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १२ | सातारा | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| १३ | सांगली | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १४ | सोलापूर | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १७ | जालना | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| १८ | परभणी | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| १९ | हिंगोली | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २० | बीड | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २१ | नांदेड | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २२ | उस्मानाबाद | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २३ | लातूर | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २५ | अकोला | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २६ | वाशिम | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| २७ | अमरावती | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २८ | यवतमाळ | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| २९ | वर्धा | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ३० | नागपूर | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ३१ | भंडारा | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | ५००००० | रूपये पाच लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | ५४६००० | रूपये पाच लाख सेहेचाळीस हजार फक्त |
| ३४ | गडचिरोली | ८००००० | रूपये आठ लाख फक्त |
| | एकूण | २०२६१००० | रूपये दोन कोटी दोन लाख एकसष्ठ हजार फक्त |

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.09.08 14:22:22 +05'30'

(चेतन निकम)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन